**इंडिया कोड पोर्टल वर अधिनियम, नियम इत्यादी अपलोड करण्यासाठी १० आयटी ऑफिस असिस्टंट ही पदे २ वर्षांच्या कालावधीसाठी बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यास व त्यासाठीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.४४/भाषा-२**
नवीन प्रशासन भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०६ मे, २०२५

वाचा :- १. भाषा संचालनालयाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२३/३३२/अठरा, दि. २३.०३.२०२३
२. भाषा संचालनालयाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३५३/कार्या.१८, दिनांक - २८.०३.२०२३.
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दि. २७.०४.२०२२

**प्रस्तावना :-** मा. सर्वोच्च न्यायालयाच्या व मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशांनुसार महाराष्ट्र राज्य अधिनियम व केंद्रीय अधिनियम यांचे अद्ययावतीकरण करुन सदर अधिनियम, नियम इ. इंडिया कोड पोर्टल वर अपलोड करण्यासाठी १० आयटी ऑफिस असिस्टंट ही पदे २४ महिन्यांच्या कालावधीसाठी बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यास मान्यतेसाठीचा प्रस्ताव उपसमितीसमोर सादर करण्यात आला असता, त्यास उपसमितीची मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-** मा. सर्वोच्च न्यायालय व मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशांनुसार इंडिया कोड पोर्टल या प्रणालीवर राज्य व केंद्रीय अधिनियम (मराठी) अपलोड करण्यासाठी भाषा संचालनालय या कार्यालयासाठी १० आयटी ऑफिस असिस्टंट ही पदे त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून २४ महिन्यांच्या कालावधीसाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळामार्फत बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु. ९५,५८,१४२/- एवढ्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. बाह्ययंत्रणेमार्फत सेवा घेणेबाबत वित्त विभागाच्या दि. २७.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील तसेच, याबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची जबाबदारी भाषा संचालनालयाची राहील.

३. तसेच, १० आयटी ऑफिस असिस्टंटकडून करुन घेण्यात येणारे राज्य व केंद्रीय अधिनियमांचे इंडिया कोड प्रणालीवर अद्ययावतीकरणाचे काम पूर्ण करण्यास २ वर्षांहून अधिक कालावधी लागणार नाही, याची दक्षता घेण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक, भाषा संचालनालय यांची राहील.

४. सदरहू बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यात आलेल्या संबंधित कर्मचाऱ्यांचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही.

५. यासाठी होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या "मागणी क्रमांक झेडएफ-१, लेखाशिर्ष २०५२, सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, ०९०, (००) (०२) भाषा संचालक (अनिवार्य) (२०५२ ५०६३) १०, कंत्राटी सेवा"या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षात उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५२८/व्यय-४, दि. १६.०१.२०२५ व अनौसं ४६६/आपुक २४, दि. १२.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच, उपसमितीने दि. ०८ एप्रिल, २०२५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५०६११२००८०४३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAISHALI LAHU WAGHMARE

Digitally signed by VAISHALI LAHU WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=1a04bc63dad109dbcf1f43d6ad6a6b5f92b8f2c67d44331739500eba2bdfc622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F557034494093273E810D83B4B4760417E6293A17606F1295B2E68D6F099E122, cn=VAISHALI LAHU WAGHMARE
Date: 2025.05.06 11:21:46 +05'30'

**(वैशाली वाघमारे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
५. सह सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई.
७. वित्त विभाग, कार्यासन व्यय-४/आ.पु.क., मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती.